**कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई या कार्यालयातील श्री.प्र.पु.निमजे, संशोधन सहाय्यक यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेले अधिसंख्य पदास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमएलआय-१०२०/प्र.क्र.२१/काम-६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ३० नोव्हेंबर, २०२१

**संदर्भ:** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६ब, दि.२१/१२/२०१९.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७अे /१६ब, दि.३०/०६/२०२०.
३) संचालक, कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था,मुंबई यांचा कार्यालयीन आदेश क्र.मश्रविसं/१२५७, दि.१०/११/२०२०.
४) शासन निर्णय, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्र.एमएलआय-१०२०/प्र.क्र.२१/ काम-६, दि.२७/११/२०२०.
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८ /१६ब, दि.२७/११/२०२०.
६) प्रबंधक, कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था,मुंबई यांचे क्र.मश्रविसं/१११५, दि.०२/११/२०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२१ डिसेंबर, २०१९ मधील तरतुदीनुसार, अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणाऱ्या अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या संख्येइतकी, असे अधिकारी व कर्मचारी सध्या ज्या पदावर कार्यरत असतील त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत तसेच उपरोक्त नमूद सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयापूर्वी, अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सेवामुक्त करण्यात आलेले अधिकारी व कर्मचारी यांच्या सेवा समाप्ती पूर्वी ते ज्या पदावर कार्यरत होते, त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करुन त्यांना मानतावादी दृष्टीकोनातून व प्रशासनाची होणारी अडचण दूर करण्यासाठी सर्व प्रशासकीय विभागांनी तात्पुरत्या स्वरुपात अकरा महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यन्त अधिसंख्य पदावर नेमणूक देणेबाबत निर्देश देण्यात आले आहे.

तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.३० जून,२०२० अन्वये सदर अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे प्राधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, दि.२७ नोव्हेंबर, २०२० अन्वये श्री.प्र.पु.निमजे, संशोधन सहाय्यक यांच्याकरीता अधिसंख्य पद निर्माण करण्यात आले. श्री.निमजे यांच्या सेवा संदर्भ क्र.३ च्या आदेशान्वये दिनाक १०/११/२०२० पासून कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई यांच्या

अंतर्गत ११ महिन्यांसाठी अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात आल्या आहेत. श्री.निमजे यांची अधिसंख्य पदावर सेवा वर्ग केल्याची मुदत दि.०९/१०/२०२१ रोजी समाप्त झाली असल्याने त्यांना दि.१०/१०/२०२१ पासून पुढे मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आता या शासन निर्णयान्वये श्री.प्र.पु.निमजे, संशोधन सहाय्यक, यांना दिनांक १०/१०/२०२१ पासून दिनांक ०९/०९/२०२२ पर्यन्त तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता किंवा सदर कर्मचारी सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यन्त किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यन्त यापैकी जे आधी घडेल तोपर्यन्त मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. श्री.प्र.पु.निमजे, संशोधन सहाय्यक हे सद्य:स्थितीत संचालक, कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असल्याने त्यांच्या वेतनावर होणार खर्च त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधितच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२७ नोव्हेंबर, २०२० नुसार प्राप्त प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२१११२९१६४६१८८६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAGUNA GANESH THENGIL

Digitally signed by SAGUNA GANESH THENGIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=d46fe3bd37ed57f0bdb52fb3a029adc135025943cb93cc90de6ceb564ced5ea3, pseudonym=E1C179DBCBC6C6E9A930E278944519A63E3712DA, serialNumber=8B4022592C04665617981351F8579C9ABD8539AE93768B3FF96B29E67B146A80, cn=SAGUNA GANESH THENGIL
Date: 2021.11.30 12:33:41 +05'30'

**( सगुणा काळे-ठेंगील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)
५. सह सचिव (कामगार), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. संचालक, कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, दादाभाई चमारबागवाला मार्ग, परेल, मुंबई.

७. महालेखापाल, (लेखापाल / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १ व २, मुंबई, नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
११. संबंधीत कर्मचारी, (कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई यांच्यामार्फत)
१२. निवड नस्ती, कामगार-६